१९८१ व १९९१ च्या जनगणना कर्मचा-यांमधील अनुसूचित जाती जमातीच्या कर्मचा-यांचा अनुशेषांतर्गत पदे भरताना विचार करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र. एईएम-१०९४/१६७/प्र.क्र.१५/९४/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० मे, १९९४.

वाचा:- १] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एईएम-१०८१/३४८७/सीआर-७/१६-अ, दि. ४.३.८२.
२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एईएम-१०८३/३५२४/सीआर-८/१६-अ, दि. ३०.८.८५
३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एईएम-१०९३/३६५५/सीआर-९/९२/१६-अ, दि. ३१ मे, १९९३
४] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रानिम-१०९२/प्र.क्र.९४/९३/१३-अ, दि. १९.८.९३
५] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसटीके-१०९३/१८११/सीआर-/१६-अ, दि. ५.१०.९३.

परिपत्रक:

१९८१ च्या जनगणनेच्या कामासाठी जनगणना विभागीय तर्फे कार्यालयातून नेमलेल्या कर्मचा-यांना त्यांची त्या कार्यालयातील सेवा संपुष्टात आल्यानंतर शासन सेवेत वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदावर तात्पुरत्या नियुक्तीसाठी १९७७-७८ च्या संपकालीन कर्मचा-यानंतरच्या पसंतीक्रम देण्याबाबत आदेश दि. ४.३.८२ तसेच दि. ३०.८.८५ नुसार निर्गमित केलेले आहेत. त्याचप्रमाणे १९९१ च्या जनगणनेच्या कामासाठी नेमलेल्या अशा कर्मचा-यांच्या बाबतीत वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदांवरील तात्पुरत्या नियुक्तीसाठी विविध आरक्षित पदाची उमेदवारी/पसंतीक्रम संपल्यानंतर पसंतीक्रमाने तात्पुरत्या नियुक्तीसाठी विचार करण्याबाबत आदेश दि. ३१.५.९३ रोजी निर्गमित केले आहेत. मागासवर्गीयांच्या सरळ सेवा भरतीतील अनुशेषांतर्गत नेमणुका करताना अशा नेमणुका प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतून वगळण्याबाबत तसेच या नेमणुका जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षते-खालील समितीमार्फत करण्याबाबत आदेश १९.८.९३ रोजी निर्गमित केलेले आहेत. १९७७-७८ च्या संपकालीन कर्मचा-यांच्या प्रतिक्षा यादीवरील मागासवर्गीय कर्मचा-यांचा सदर समितीमार्फत अनुशेषांतर्गत पदे भरताना विचार करावा अशा सूचना दि. ५.१०.९३ रोजी देण्यात आल्या आहेत.

२. १९८१ तसेच १९९१ च्या जनगणना कर्मचा-यांमधील जे मागासवर्गीय कर्मचारी आहेत त्यांना संधी देऊन अनुशेषांतर्गत पदे भरताना त्यांचा विचार करावा अशी मागणी काही लोकप्रतिनिधींनी शासनाकडे केली आहे. तरी त्या संदर्भात सर्व जिल्हाधिका-यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत मागासवर्गीयांच्या

१९८१ व १९९१ च्या अनुसूचित जाती/जमातीच्या जनगणना कर्मचा-यांची मागणी करून त्यांचा ही विचार करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

[अ. रा. साळवी]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागाखालील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.